राज्यातील स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या शासन मान्य व अनुदान प्राप्त अशासकीय दिव्यांगांच्या निवासी / अनिवासी विशेष शाळा / कर्मशाळा व मतिमंदांकरीताची बालगृहे यामधील पूर्णवेळ शिक्षक आणि शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सुधारित वेतन संरचना लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन शुद्धीपत्रक क्रमांक : इडीडी-२०२२ /प्र.क्र.१७/दि.क.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२२.

वाचा : १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : इडीडी-२०१९ / प्र. क्र. १२० / दि. क. १, दिनांक २३ एप्रिल, २०२१.

**शासन शुद्धीपत्रक :**

राज्यातील स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येणाऱ्या शासन मान्य व अनुदान प्राप्त अशासकीय दिव्यांगांच्या निवासी / अनिवासी विशेष शाळा / कर्मशाळा व मतिमंदांकरीताची बालगृहे यामधील पूर्णवेळ शिक्षक आणि शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दिनांक २३ एप्रिल, २०२१ च्या शासन निर्णयान्वये सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन संरचना लागू करण्यात आलेली आहे. तसेच सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, मुंबई शहर / उपनगर यांनी त्यानुसार वेतननिश्चिती करावी व आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांच्या कार्यालयामार्फत त्याची पडताळणी करावी, अशा सूचना देण्यात आलेल्या आहेत.

२. तथापि राज्यातील दिव्यांगांच्या अनुदानित विशेष शाळा / कर्मशाळा ह्या एकूण ८५२ असून मतिमंदांकरीताची बालगृहे एकूण १४ आहेत. यांमध्ये मोठ्या प्रमाणात कर्मचारी कार्यरत असल्याने आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांचे कार्यालयातील मर्यादित कर्मचारीवर्गाकडून सेवापुस्तके पडताळण्यासाठी कालापव्यय होतो. सदर बाब विचारात घेता उक्त कार्यालयांमधील कर्मचाऱ्यांची सेवापुस्तके पडताळणी करण्याचे अधिकार आता संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण यांचेकडे सोपविण्यात येत आहेत.

३. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्याता आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०२१५१३०१०५६२२२ असा आहे. तसेच सदर शासन शुद्धीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2022.02.15 13:04:13 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई,

२) मा.  मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव /सचिव,
३) मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,
४) मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक,
७) अपर मुख्य सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहायक,
८) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपुर,
९) प्रधान महालेखापाल ( लेखापरीक्षा), महाराष्ट्र, १ / २, मुंबई / नागपुर,
१०) आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे,
११) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग,
१५) सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण विभाग,
१६) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,
१७) अवर सचिव, वित्त विभाग, सेवा-९, मंत्रालय,
१८) अवर सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) निवड नस्ती.